

# एका झटक्यात सात


पुनर्कथन: फ्रेया

चित्र: जैक कैन्ट

मराठी: अश्विनी बर्वे




एके काळची गोष्ट आहे, एक छोटा शिंपी होता. एक दिवस तो आपल्या पावाला जॅम लावून खात होता. अचानक त्याने बघितले की डझनभर माशा जॅमच्या दिशेने येत आहेत.

“गुणगुण” माशांनी आवाज केला.

‘‘तुम्हांला इथं कोणी बोलावलं?” शिंपी म्हणाला. “हा जॅम माझ्यासाठी आहे.”

‘‘गुणगुण, गुणगुण,” माश्या म्हणाल्या.

‘‘चला पळा इथून,” शिंपी नाराज होत म्हणाला.

‘‘गुणगुण गुण गुण!” माश्या गु गुं गुं गुं गुं गुं गुं! माश्या गुणगुणत राहिल्या.

"तुम्हांला नाही मिळणार जॅम," शिंपी  कडक आवाजात म्हटला. आणि फटाक! त्याने माशांवर फाडकन झाडू मारला.



त्याने एकाच झटक्यात सात माशांना मारून टाकलं.

त्याने मोजल्या.

"एक, दोन, तीन, चार पाच, सहा, सात!"

"व्वा! मी किती शूर आहे!" शिंपी खूप खुश झाला.

"ही गोष्ट तर सर्व जगाला सांगायला हवी."

म्हणून त्याने आपलीसाठी एक पट्टा तयार केला.

त्याने मोठ्या अक्षरात कशिदा काढून लिहलं.

एका झटक्यात सात

शिंप्याने कंबरेला पट्टा बांधला.

"आता मी जगाला आपल्या शौर्य कथा सांगायला पूर्ण तयार आहे."

आपल्या खिशात शिंप्याने पनीरचा तुकडा ठेवला.

त्याच्या अंगणात एक चिमणी बसली होती. ती त्याने आपल्या खिश्यात ठेवली.

आणि रस्त्याने चालू लागला.

चालत-चालत एका डोंगरापर्यंत पोहचला आणि थेट वर पर्यंत चढला.



तिथं एक मोठा राक्षस बसला होता.

"नमस्कार राक्षसा," छोट्या शिंप्याने म्हटले. "मी जगाला हे सांगायला जात आहे की मी किती शूर आहे. तू माझ्याबरोबर येतोस काय?"

"हा! हा! हा!" राक्षस मोठ्याने हसला.

"तू एक मूर्ख माणूस आहे."




"मी छोटा असू शकतो," शिंपी म्हणाला. "पण माझ्या पट्टाकडे जरा बघ."

"एक... ही...झटक्यात ......सात...मारले.."

राक्षसाने  अक्षर जोडून –जोडून वाचले.

(त्याने विचार केला की या छोट्या माणसाने एका झटक्यात सात माणसांना मारून टाकले.त्याला माश्यांच्याबाबत माहित नव्हते.)

"ठीक आहे, वाईट नाही, राक्षस म्हणाला.

"पण तू हे करू शकतो?"

राक्षसाने एक मोठा दगड उचलला आणि तो एवढा जोरात दाबला की त्यातून पाणी गळू लागले.

शिंप्याने आपल्या खिशातील पनीरचा तुकडा काढला आणि तोपर्यंत दाबला जोपर्यंत त्यातले पाणी निघून जात नाही.



"आणि याबाबत तुझं काय म्हणणं आहे?" राक्षसाने विचारलं.

त्याने एक दगड उचलला आणि तो एवढा वर फेकला की शिंप्याला तो दिसणे कठीण झाले.

"तू फेकलं तर चांगलं आहे," शिंप्याने स्तुती केली.

"मग तो जमिनीवर परत पडला. मी माझा दगड एवढा वर फेकेन की तो परत खाली येणारच नाही."

शिंप्याने आपल्या खिशातली चिमणी काढली आणि तिला हवेत उडवलं. चिमणी तर वर उडून गेली ..अजून वर...खूप वर आणि आणि मग आकाशात दिसेनाशी झाली.



“हम्म्म्म्म्म,” राक्षस म्हणाला.

“हो तू छोटा असून सुद्धा एखाद्या राक्षसा इतका ताकदवान आहे. तू या झाडाला उचलायला मदत करशील काय?”

“हे तर खूप सोप्पं आहे,” शिंपी लगेच म्हणाला. “असं कर तू याचं धड उचल, मी त्याच्या फांद्या उचलतो.”

“ठीक आहे,” राक्षसाने मान्य केले. त्याने धड आपल्या खांद्यावर ठेवले.









शिंपी झाडाच्या फांदीवर चढला.दर्ज़ी आणि राक्षस पूर्ण झाड आणि नकळत शिंप्याला उचलून नेऊ लागला.

छोट्या शिंप्यासाठी हा प्रवास आरामदायी होता. तो पूर्ण रस्ताभर शिट्टी वाजवत राहिला.

पण राक्षस थकून गेला.

''सांभाळून'' तो जागेवर पोहचल्यावर म्हणाला.

''मी झाड खांद्यावरून खाली टाकत आहे.''

शिंप्याने  लगेच जमिनीवर उडी मारली.त्याने असं नाटक केलं की जणू त्याने फांद्या उचलल्या आहेत.

''काय झालं राक्षस भावा?'' त्याने विचारलं.

''इतकं छोटं झाड उचलून थकला का?''

इकडे तर राक्षसाला दम लागला होता.

''जर तू इतका शूर आणि ताकदवान आहेस,'' राक्षस म्हणाला, ''मी तुला आव्हान देतो की तू माझ्या बरोबर माझ्या गुहेत चल... त्यात अजून राक्षस आहेत.''

''का नाही!'' छोटा शिंपी न घाबरता म्हणाला.

दोघं तिकडे निघाले.



लवकरच ते गुहेत पोहचले.आता सहा राक्षस शेकोटीजवळ बसलेले होते. अर्धी-अर्धी गाय मजेत खात होते.



“किती छान आहे तुमची जागा,” शिंपी म्हणाला.

“माझ्या घरापेक्षा खूप मोठी आहे.”

“हे आमचं घर आहे,” राक्षस म्हणाला. “आम्ही इथं खूप खुश आहोत. तू थकला असशील. तू या पलंगावर आरामात का झोपत नाही?”

“आभार,” शिंपी म्हणाला.

पण पलंग शिम्प्यासाठी खूप मोठा होता.

म्हणून जेव्हा राक्षस त्याच्याकडे बघत नाही असं बघून तो गपचूप उठला.

आणि गुहेच्या एक कोपरा शोधला आणि तिथं जाऊन तो झोपला.



अर्ध्या रात्री राक्षसाने विचार केला की शिंपी गाढ झोपला असेल.

सगळ्या राक्षसाने आपापले भाले उचलले आणि पलंगाचा कुटून कुटून पार चक्काचूर केला.

"हे घे!" राक्षस म्हणाले.

"एका झटक्यात सात मारले म्हणणाऱ्या छोट्याचे काम तमाम केले."



दुसऱ्या दिवशी सकाळी सात राक्षस शिकारीच्या शोधात गुहेच्या बाहेर जंगलात निघाले.

थोड्याच वेळात त्यांनी कोणालातरी शिट्टीवर गाणं वाजवतांना ऐकलं.

वळून मागे बघितलं तर छोटा शिंपी दिसला.

"अरे हा तर मेला होता ना!" एक राक्षस ओरडला.

"तो आपल्याला मारायला आला आहे," दुसरा ओरडला.

आणि तेव्हा सर्वचे सर्व राक्षस धूम ठोकून पळाले.

छोटा शिंपी आपल्या रस्त्याने पुढे जात राहिला. तो जंगलातून निघाला आणि पुढे चालू लागला, आणि राजाच्या बागेत पोहचला.

“पडण्यासाठी ही जागा चांगली आहे,”त्याने विचार केला. आणि एका दाट सावलीच्या झाडाखाली आडवा झाला आणि त्याला झोप लागली.



राजाचे पहारेकऱ्यांनी शिंप्याला गाढ झोपलेले पाहिले.त्यांनी त्याच्या पट्टावरचे शब्द वाचले.

एका झटक्यात सात ठार

(त्यांना वाटले की त्या गड्याने सात लोकांना एका झटक्यात मारले. त्यांना माश्यांबद्दल माहितच नव्हते.)

“ नक्कीच हा खूप शूर माणूस आहे,” ते म्हणाले.

“चला, याला राजाकडे घेऊन जाऊ या.”

त्यांनी शिंप्याला जागं केलं आणि त्याला राजाकडे घेऊन गेले.

“मी तुमची काय सेवा करू शकतो हुजूर?” शिंप्याने नम्रतापूर्वक राजाला विचारले.

“जंगलात माझी झोपडी आहे, त्याच्याजवळ एक रक्तपिपासू जंगली डुक्कर आहे,” राजा म्हणाला.

“त्याने पहारेकरयांना मारून टाकले आहे. तू त्याला पकडू शकतो का?”

“मला वाटतं मी हे करू शकतो,” शिंप्याने निडरपणे उत्तर दिले.



जर तू हे करू शकला ..आणि अजून दोन कामं सुद्धा केली.” राजा म्हणाला, “तर मी माझं अर्ध राज्य तुला देईन आणि माझ्या मुलीशी तुझं लग्न लावून देईन.”

राजकुमारी आपल्या वडिलांजवळ उभी होती.ती छोट्या शिंप्याकडे बघून हसली.

शिंपी सुद्धा तिच्याकडे बघून हसला.

“बेशक मी करू शकेल,” शिंपी म्हणाला.

आणि तो जंगलाकडे निघाला.

जंगलातल्या छोट्या झोपडीजवळच डुक्कर दिसलं.

ते भीमकाय होतं आणि रक्तपिपासू होते. त्याचे मोठे दात पण दिसत होते.

छोट्या शिंप्याला बघतच डुक्कराने त्याच्यावर झडप घातली. शिंप्याला ढकलत ते त्याच्या मागे-मागे झोपडीत घुसले.









चपळाईने शिंप्याने खिडकीतून बाहेर उडी घेतली आणि पळत दुसरीकडे जाऊन त्याने दरवाजा बंद केला.

आता डुक्कर झोपडीत कैद झाला होता. शिंप्याने शिट्टीवर एक धून वाजवली आणि राजाला सांगायला निघून गेला.



“मी त्या जंगली डुक्कराला पकडलं आहे,” शिंप्याने बातमी दिली.

“तुम्ही तुमचे पहारेकरी पाठवून त्याला मारू शकतात. मला दुसरं कोणतं काम करायचं आहे?”

“माझ्या जंगलात एक एकशिंगा (यूनिकॉर्न) आहे. त्याने आपल्या शिंगाने माझ्या पाच पहारेकरी जखमी केले.तू त्या एकशिंग्याला पकडशील का?”

“बेशक पकडू शकतो,” शिंप्याने उत्तर दिले. त्याने एक कुऱ्हाड आणि एक दोर घेतला आणि जंगलाकडे निघाला.





लवकरच त्याला एकशिंगा दिसला. आणि एकशिंग्याने सुद्धा त्याला पहिले. एकशिंगा हल्ला करायला तयार होता.

छोटा शिंपी हालचाल न करता आपल्या जागेवर उभा राहिला.जोपर्यंत एकशिंगा त्याच्या जवळ येत नाही तोपर्यंत.

तेव्हा तो चपळाईने एका झाडाच्या मागे सरकला.एकशिंग्याने आपले टोकदार शिंग त्या झाडाच्या मध्ये घुसवले.

छोट्या शिंप्याने एकशिंग्याच्या गळा दोरीने बांधला.

मग कुऱ्हाडीच्या मदतीने त्याने त्याचे शिंग जे झाडत घुसवले होते ते तोडून टाकले.



त्याने शिट्टीवर एक छोटी धून वाजवली आणी एकशिंग्याला राजाकडे घेऊन गेला.

''हा घ्या एकशिंगा,'' छोट्या शिंप्याने म्हटले. “ते तिसरे काम काय आहे, जेम्ला करायचे आहे?”

''शेवटचं काम सगळ्यात मुश्किल आहे,” राजा म्हणाला.

“नदीजवळ राक्षस आहेत. जे कोणी त्यांच्यासमोर जातात त्यांना ते मारून टाकतात. तू त्या राक्षसांना मारू शकतो का?”

''बेशक मारु शकतो.” शिंप्याने उत्तर दिले. आणि तो नदीकडे निघाला.

त्याला दोन्ही राक्षस झाडाच्या खाली सापडले. दोघंही गाढ झोपले होते आणि घोरत होते ‘‘घर्रर्रर्रर्रर्र’’

शिंप्याने आपला खिसा दगडांनी भरून घेतला. तो चपळाईने झाडावर चढला. तेव्हा त्याने एका झोपलेल्या राक्षसाच्या टोपीवर काही दगड फेकले.



तो राक्षस चकित होऊन जागा झाला. त्याने आपल्या साथीदाराला धक्का दिला.

"तू मला का मारतो आहेस?" त्याने विचारलं.

"मी नाही मारलं. तू स्वप्नं बघत असशील," दुसरा म्हणाला.

आणि मग दोघंही झोपून गेले.



आता शिंप्याने दुसऱ्या राक्षसाच्या डोक्यावर दगड फेकले.

तो ही चकित होऊन जागा झाला आणि ओरडला,

"मला मारू नको."

"मी नाही मारलं," पहिला राक्षस म्हणाला.

"यावेळी तू स्वप्नं बघत असशील." दोघंही परत झोपले.

यावेळी शिंप्याने दोन्ही राक्षसांच्या डोक्यावर एकाच वेळी

दगड फेकले. जितके जोरात फेकता येईल तितक्या जोरात मारले.

दोन्ही राक्षस जागे झाले आणि रागाने एकमेकांशी भांडू लागले. ते एवढे नाराज झाले होती की त्यांनी झाडं उखाडली.त्यांनी एकमेकांवर झाडांनी वार केले. ते तोपर्यंत मारत सुटले जोपर्यंत दोघंही मरून जमिनीवर पडत नाही.



शिंप्याने शिट्टीवर एक धून वाजवली आणि राजाला खुशखबरी द्यायला गेला.

“करून दाखवलं मी!” त्याने घोषणा केली.

“राक्षस मेले आहेत.तुमच्या पहारेकरी पाठवून त्यांचे दफन करून टाका.”

‘‘तुम तो सचमें बड़े बहादुर हो!’’ राजा ने खुशी से कहा।

“तुमचे वचन लक्षात आहे ना तुमच्या?” शिंप्याला जाणून घ्यायचं होतं.

“सांगितल्याचे लक्षात आहे,” राजाने उत्तर दिले. मग त्याने एक मेजवानी दिली. राजकुमारीचे आणि शिंप्याचे लग्न झाले.

मग छोट्या शिंप्याला अर्ध्या राज्याचा राजा केले.






शिंपी आपला मुकुट नेहमी घालून ठेवत असे आणि आपला पट्टासुद्धा, ज्यावर लिहलं होतं

एकाच झटक्यात सात मारले.

छोटा पण शूर



समाप्त